**कृषि अभियांत्रिकी /यांत्रिकीकरण योजने अंतर्गत प्रोत्साहन पर (२५%)अर्थसहाय्य उपलब्ध करून योजना सन २०११-२०१२ मध्ये राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो - १६१० /रा.हि./ प्र.क्र. १७७ /४अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२,**
**दिनांकः - १७ सप्टेंबर, २०११**

**संदर्भ** :- १ ) शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो /व्हि.डॉ - १६१० / प्र.क्र. ३१ /४अे, दि. ९ मार्च, २०११
२) शासन निर्णय, क्रमांक एसडीआय-१६१० /प्र.क्र.१५९ /४अे, दिनांक :- ३० जून, २०११
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृउसं-७ / कृ.यां/ प्रस्ताव / राज्य हिस्सा / ९७३/ ११ दिनांक १८ जुलै, २०११

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना कृषि यांत्रिकीकरण करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी सन १९८५-८६ पासून १००% केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राज्यात राबविण्यात येत आहे.

सन २००९-१० पर्यंत राज्यामध्ये कृषि यांत्रिकीकरणास चालना देण्यासाठी १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजने अंतर्गत विविध औजारांचा २५ टक्के ते ५० टक्के अनुदानावर शेतकऱ्यांना पुरवठा करण्यात येत होता. राज्यातील विविध जिल्हयातील लोकप्रतिनिधी व पदाधिकारी यांच्याकडून कृषि यांत्रिकीकरणाची वाढती मागणी विचारात घेऊन, तसेच कृषि उत्पादकता वाढविण्यासाठी कृषि औजारांचे अनन्यसाधारण महत्व लक्षात घेता, केंद्र शासनाच्या अनुदानाची मर्यादा लक्षात घेऊन राज्य शासनामार्फत अतिरिक्त २५ टक्के अनुदानाची वाढ करून सरसकट ५० टक्के अनुदानाने कृषि औजारांचे शेतकऱ्यांना वाटप करण्याचे राज्य शासनाने नियोजित केले आहे. त्यानुषंगाने सन २०१० - ११ मध्ये कृषि यांत्रिकीकरणाचा सरसकट ५० टक्के अनुदान वाटपाचा कार्यक्रम राबविण्यासाठी रू. ४००.०० लाख (रू. चार कोटी फक्त ) निधीच्या कार्यक्रमास संदर्भाधीन अ.क्र. १ अन्वये मान्यता देण्यात आली होती. त्याप्रमाणे सन २०१०-११ मध्ये " ट्रॅक्टर " हा घटक वगळता इतर कृषि औजारे ५० टक्के अनुदानावर वितरित करण्यात आली होती . सन २०११ - १२ मध्ये केंद्र शासनाने सदर योजनेकरिता कृति आराखड्यांतर्गत रू. १६००.०० लाख ( रू. सोळा कोटी फक्त) निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून, सदर निधीस संदर्भाधीन अ.क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रू. १६००.०० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व रू. १२००.०० लाख निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. कृषि यांत्रिकीकरण योजनेतील औजारांना केंद्र शासनाच्या अनुदान मर्यादे व्यतिरिक्त अतिरिक्त २५टक्के प्रोत्साहन पर अनुदान राज्य योजनेतून देऊन एकूण अनुदान मर्यादा ५० टक्के गृहीत धरून रू. १०००.०० लाख ( रू. दहा कोटी फक्त ) इतक्या रकमेचा राज्य हिश्श्याच्या कार्यक्रमास प्रशासकीय व रू.७५०.०० लाख ( रू. सात कोटी पन्नास लाख फक्त ) कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील विविध जिल्हयातील लोकप्रतिनिधी व पदाधिकारी यांच्याकडून कृषि यांत्रिकीकरणाची वाढती मागणी विचारात घेऊन, तसेच कृषि उत्पादकता वाढविण्यासाठी कृषि औजारांचे अनन्यसाधारण महत्व लक्षात घेऊन, केंद्र शासनाच्या अनुदानाची मर्यादा लक्षात घेऊन राज्य शासनामार्फत अतिरिक्त २५ टक्के अनुदानाची वाढ करून सरसकट ५० टक्के अनुदानाने कृषि औजारांचे शेतकऱ्यांना वाटप करण्याचे राज्य

शासनाने नियोजित केले असून सदरहू योजना राज्यामध्ये सन २०११ - १२ मध्ये राबविण्याकरिता रू. १०००.०० लाख ( रू. दहा कोटी फक्त ) निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय व रू. ७५०.०० लाख ( रू. सात कोटी पन्नास लाख फक्त ) निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना या शासन निर्णयाच्या सोबत जोडलेल्या परिशिष्टानुसार राबविण्यात यावी.

२. या योजनेसाठी मंजूर केलेला रू. ७५०.०० लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०११-१२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष :-**
**मागणी क्रमांक डी -३,**
**२४०१-पीक संवर्धन**
**११३- कृषि अभियांत्रिकी**
**(००) (१६ ) कृषि अभियांत्रिकी / यांत्रिकीकरण करण्यासाठी प्रोत्साहनपर (२५%) अर्थसहाय्य**
**(२४०१ ८७३६ ) (राज्य योजना ) ( योजनांतर्गत )**
**३३ - अर्थसहाय्य**

३. सदर योजना शासन निर्णय, क्रमांक कृयांयो-१६११ /प्र.क्र.१५९/४अे, दिनांक:- ३० जून, २०११ नुसार वितरित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्यात यावी. अनुदानाचा लाभ देताना, सन २०११-१२ मध्ये केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजने अंतर्गत औजारे व सयंत्रे यांचा लाभ घेतलेल्या लाभार्थ्यांनाच सोबत जोडलेल्या परिशिष्टामधील नमूद घटकासाठीच या अनुदानाचा लाभ देय राहणार आहे.

**४.** या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत असून या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहिल याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे वितरित करण्याची जबाबदारी **कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांची राहिल

५. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यत विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र १६५/११ /व्यय- १ दि. १२ सप्टेंबर, २०११ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक साकेतांक **२०११०९२११२५२३५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( वि.मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.( ५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे.(१० प्रती)
जिल्हाधिकारी (सर्व)

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
सर्व संचालक/ सहसंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या.राजन हाऊस,प्रभादेवी, मुंबई-२५
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हापरिषद)
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
सर्व कोषागार अधिकारी
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन महासंघ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,भूविकास बँक, मुंबई
अध्यक्ष सर्व जिल्हा परिषदा सर्व विधान मंडळ सदस्य, द्वारा-विधानमंडळ सचिवालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२/
निवडनस्ती

**शासन निर्णय क्र. कृयांयो - १६११ /रा.हि./ प्र.क्र. १७७ /४अे,दि. १७ सप्टेंबर, २०११ सोबतचे परिशिष्ट**

| अ क्र | बाब | केंद्र शासनाचा सहभाग | | राज्य शासनाचा सहभाग | | केंद्र व राज्य मिळून शेतकऱ्यांना देय | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **अनुदानाची टक्केवारी** | **आर्थिक मर्यादा** | **अनुदानाची टक्केवारी** | **आर्थिक मर्यादा** | **अनुदानाची टक्केवारी** | **आर्थिक मर्यादा** |
| १ | ट्रॅक्टर | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. ४५०००/- | **किंमतीच्या १७ टक्के** | **जास्तीत जास्त रू. ३०६००/-** | किंमतीच्या ४२ टक्के | जास्तीत जास्त रू. ७५६००/- |
| २ | पॉवर टिलर ( ८ एच.पी. पेक्षा जास्त एचपीचे ) | किंमतीच्या ४० टक्के | जास्तीत जास्त रू. ४५०००/- | **किंमतीच्या १० टक्के** | **जास्तीत जास्त रू. १२०००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ५७०००/- |
| ३ | स्वयंचलीत औजारे/सयंत्रे | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. ४००००/- | **किमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. ४००००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ८००००/- |
| ४ | विशेष शक्तीवर चालणारी सयंत्रे/ औजारे | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. १५०००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. १५०००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ३००००/- |
| ५ | विशेष शक्तीवर चालणारी सयंत्रे/ औजारे | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. २००००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. २००००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ४००००/- |
| ६ | मनुष्य चलित औजारे/सयंत्रे | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. २०००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. २०००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ४०००/- |
| ७ | बैलचलित औजारे | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. २५००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. २५००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ५०००/- |
| ८ | ट्रॅक्टर/ पॉवर टिलर चलित औजारे | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. १००००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. १००००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. २००००/- |
| ९ | पॉवर थ्रेशर | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. १००००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. १००००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. २००००/- |
| १० | डिझेल /इलेक्ट्रीक पंपसेट | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. १००००/- | **-------** | **--------** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. १००००/- |
| **११** | **पिकसंरक्षण औजारे** | | | | | | |
| अ | मनुष्य चलित | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. २००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. २००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ४००/- |
| ब | शक्ती चलित | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. २९००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. २९००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ५८००/- |
| क | ट्रॅक्टर चलित | किंमतीच्या २५ टक्के | जास्तीत जास्त रू. ४०००/- | **किंमतीच्या २५ टक्के** | **जास्तीत जास्त रू. ४०००/-** | किंमतीच्या ५० टक्के | जास्तीत जास्त रू. ८०००/- |